रत्नागिरी विशेष कारागृहातील टोपली पध्दतीच्या शौचालयाचे जलधौत शौचालयात रूपांतर करण्यास प्रशासकीय मान्यता देणे.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्रमांक-बीएलडी-१५९३/१(४०)/पीआरएस-२.
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२. दिनांक:- ७ डिसेंबर १९९८.

वाचा:- १] कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्रमांक-एफबायपी/१४८८/१/कक्ष-३, दिनांक ६.२.९८.
२] वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक-विअप्र-१०९२/प्र.क्र.११३/९२/विनियम/दिनांक १ जून १९९२.

शासन निर्णय :- कारागृहाचे आधुनिकीकरण व कारागृहाच्या परिसराची स्वच्छता व सार्वजनिक आरोग्य जोपासण्यासाठी कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी रत्नागिरी येथील विशेष कारागृहातील टोपली पध्दतीच्या शौचालयाचे जलधौत शौचालयात रूपांतर करण्याबाबतच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता द्यावी म्हणून प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी सादर केला असून सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत शासनाच्या विचाराधीन होता.

२. रत्नागिरी येथील विशेष कारागृहातील टोपली पध्दतीच्या शौचालयाचे जलधौत शौचालयात रूपांतर करण्याबाबतच्या कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या प्रस्तावास शासन या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देत आहे. तसेच यासाठी होणारा खर्च रुपये ४,८९,०००/- [रु. चार लक्ष एकोण नव्वद हजार फक्त] इतक्या रकमेचे अंदाजपत्रक मंजूर करून घेण्यास सन १९९९-२००० या आर्थिक वर्षात शासन या आदेशाद्वारे मान्यता देत आहे.

३. कारागृह महानिरीक्षक यांच्या वरील प्रस्तावास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

१] या प्रस्तावास वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. विअप्र-१०९२/प्र.क्र.११३/९२ विनियम/दिनांक १.६.९२ च्या अटी लागू रहातील. तसेच वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८, भाग पहिला, उप विभाग, तीन महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका खंड-१, अ.क्र.४, स्तंभ-५ खाली प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकाराचा वापर करून व सदर अटींच्या आधीन राहून प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२] प्रशासकीय मान्यता मिळालेले काम प्रथम हाताळण्यात यावे.

३] सदर प्रस्तावास आर्थिक तरतूद मंजूर झाल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.

४] यासाठी मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातच बांधकाम पूर्ण करण्यात यावे. त्यासाठी जादा अनुदान मंजूर करण्यात येणार नाही.

४. यासाठी होणारा खर्च लेखाशिर्ष "४०५९-सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च-०१ कार्यालयीन इमारती, १०१ बांधकाम पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-दुर्ग-मागणी क्र.एच२५" या लेखाशिर्षाखाली आर्थिक वर्ष १९९९-२००० मध्ये उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, नियोजन विभाग यांच्या सहमतीने व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.सोआर-६६१/९८/व्यय-८ दिनांक २१.११.९८ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( ता.स. नाईक )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय) महाराष्ट्र राज्य, पुणे.
कारागृह उप महानिरीक्षक, पश्चिम विभाग, येरवडा, पुणे.
अधिक्षक, जिल्हा कारागृह, रत्नागिरी.
महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परिक्षा) मुंबई.
जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी.
वित्त विभाग (व्यय-८) मंत्रालय, मुंबई.
नियोजन विभाग (का.क्र.१४५५) मंत्रालय, मुंबई.
सार्वजनिक बांधकाम विभाग, इमारत-२/अर्थ-२, मंत्रालय, मुंबई.
कार्यासन अधिकारी, पोपुडी-१ गृह विभाग, नवीन प्रशासकीय भवन.
निवडनस्ती (पोआरएम-२)